जकात कर रद्द करणे आणि त्याऐवजी
पर्यायी महसुलाचे साधन शोधून काढणे
या प्रयोजनासाठी नियुक्त केलेल्या
समितीला अहवाल सादर करण्यास
मुदत वाढ देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ७ सप्टेंबर १९९३.

वाचा :- शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-संकीर्ण-१०९१/३४/कराधान-१,
दिनांक ७.६.१९९३.

प्रस्तावना:-जकात कर रद्द करुन त्याऐवजी पर्यायी महसुलाचे साधन शोधून काढण्यासाठी शासनाने नियुक्त केलेल्या उपरोक्त जकात कर विषयक समितीला त्यांचा अहवाल सादर करण्यासाठी ३ महिन्यांचा कालावधी विहित करण्यात आला होता. तो कालावधी दिनांक ७.९.१९९३ रोजी संपुष्टात येत आहे. तथापि अद्यापही समितीच्या कामकाजासाठी व अहवाल सादर करण्यासाठी काही कालावधी वाढवून देण्याची आवश्यकता निर्माण झालेली आहे. तसेच जकात कराचा संबंध प्रामुख्याने वाहतुक व्यवहारांशी येत असल्यामुळे सदर समितीवर सचिव [परिवहन] आणि सचिव [ग्राम विकास] यांची सुध्दा सदस्य म्हणून नियुक्ती करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

शासन निर्णय:- या संदर्भात काळजीपूर्वक विचार केल्यानंतर शासन असा आदेश देत आहे की, दिनांक ७ जून १९९३ च्या वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१ अन्वये नियुक्त करण्यात आलेल्या जकात कर विषयक समितीला अहवाल सादर करण्यासाठी विहित केलेला ३ महिन्यांचा कालावधी दिनांक ३१ ऑक्टोबर १९९३ अखेरपर्यंत वाढविण्यात यावा. तसेच सचिव [परिवहन], गृह विभाग आणि सचिव [ग्राम विकास] ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांची सुध्दा सदर समितीचे सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ वि.प्र. कुलकर्णी ]
शासनाचे अवर सचिव,
वित्त विभाग.

प्रत माहितीसाठी सादर अग्रेषित:-

१] समितीचे सर्व सदस्य.

२] मा. मुख्य मंत्र्यांचे सचिव.

३] वित्तमंत्री/ वित्त राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.

४] सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

५] सचिव [परिवहन], गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

६] सचिव [ग्राम विकास] ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७] विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, ८ वा मजला, मुंबई-४०० ०१०.

८] महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

९] महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.

१०] महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.

११] निवड नस्ती, कराधान-१.